**अधीक्षक अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद यांना नियंत्रक अधिकारी म्हणुन घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांक : नियंअ १०.१०/प्र.क्र. २३०/२०१०)/ला(आस्था)

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २९ डिसेंबर, २०१०

**प्रस्तावना :-**

अधीक्षक अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद यांच्या कार्यक्षेत्रातील नांदुर मधमेश्वर या प्रकल्पाचा समावेश केंद्र शासन सहाय्यित लाभक्षेत्र विकास व जलव्यवस्थापन कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाच्या दि.१८/०२/२०१० च्या पत्रान्वये करण्यात आलेला आहे. सदर प्रकल्पास राज्य व केंद्र हिस्स्यापोटी प्राप्त केंद्रीय सहाय्याच्या अनुषंगाने राज्यशासनाकडुन वेळोवेळी निधी वितरीत होणार असल्याने सदर निधी खर्च करण्यासाठी अधीक्षक अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद यांना नियंत्रक अधिकारी म्हणुन घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र कोषागार नियम-१९६८, मधील नियम १३ अन्वये व वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे २००९ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार अधीक्षक अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद यांना नियंत्रक अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

तसेच महाराष्ट्र कोषागार नियम-१९६८ मधील नियम १५६ अन्वये आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची कार्यवाही अधीक्षक अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद यांनी करावी असे आदेशीत करण्यात येत आहे.

सदर शासननिर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात येत असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१०१२२९२०५८४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(अ.रा. अरगडे)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत: महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखा परिक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव(लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद,
आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधीक्षक अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद,
कार्यकारी अभियंता, नांदुर मधमेश्वर कालवा विभाग, वैजापुर
जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
अर्थ-१ कार्यासन, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
लाक्षेवि(आस्था) कार्यासन संग्रहार्थ.